**महाराष्ट्र वानिकी प्रकल्पांखालील उत्पादन वानिकी कार्यक्रमांतर्गत अस्थायी पदे सन २०२४-२५ मध्ये चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:-एफडीएम -२०२४/प्र.क्र.१५/फ-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १५ मार्च, २०२४.

**वाचावे :-** १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९ व दि.२१.०९.२०२१.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक- एफडीएम २०२३/प्र.क्र.२१/फ-२ दि. ११.१०.२०२३
३) उप वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांचे पत्र क्र.जा.क्र. कक्ष-३/योजनेत्तर/प्र.क्र.४६ (२३-२४)/२४९, दि.२६.०२.२०२४.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४.

**<u>शासन निर्णय</u> :-**

महाराष्ट्र वानिकी प्रकल्पाखालील उत्पादन वानिकी कार्यक्रमांच्या अंतर्गत खालील १३ अस्थायी पदांना सन २०२३-२४ मध्ये दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ पर्यंत चालू ठेवण्यास संदर्भ क्र.२ येथील दि.११.१०.२०२३ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली होती. सदर मुदत दि.२९.०२.२०२४ रोजी संपुष्टात आली आहे. त्याअनुषंगाने खाली दर्शविलेल्या विवरण पत्रातील १३ अस्थायी पदे ही संदर्भ क्र.१ अन्वये वन विभागाच्या मंजूर आकृतीबंधात समाविष्ट असल्याने, या १३ अस्थायी पदांना वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णय दि.२१.०२.२०२४ च्या अधिन राहून दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सहायक वनसंरक्षक | ६ |
| २ | वनक्षेत्र सर्वेक्षक | ६ |
| ३ | सहाय्यक वन सांख्यिकी | १ |
| | **एकूण** | **१३** |

सदरहू अस्थायी पदांच्या वेतनावरील खर्च ‘प्रधान शीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, (योजनेतर) ०१ वनीकरण, १०१ वनसंधारण, विकास व पुनर्निर्मिती (०२) (०२) कृत्रिम पुनर्निमिती (२४०६ ०१२२) ०१ वेतन या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२४-२५ यावर्षी त्याखालील मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. तथापि, सदरहू शासन निर्णयातील तरतुदींचे योग्यरित्या पालन होईल, याची दक्षता प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५१६१६१६३४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRADNYA
PRAMOD MULE

Digitally signed by PRADNYA PRAMOD MULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=2a213e61027be02368b2655e124509e72fb3a334568af813992b1c4e97e13f87, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CF29F03589BBC02EDE91053BB5AEF9A7F21612D23D0578DB9118FC7E32141805, cn=PRADNYA PRAMOD MULE
Date: 2024.03.15 16:25:39 +05'30'

**( प्रज्ञा मुळे )**
**कक्ष अधिकारी महसूल व वन विभाग**

**प्रतिलिपी** :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व).
४) मुख्य वनसंरक्षक, मध्यवर्ती मुल्यांकन घटक, नागपूर.
५) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर.
६) वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सह्याद्री व्याघ्र राखीव, कोल्हापूर.
५) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
७) वित्त विभाग, व्यय १०/अर्थसं-६, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/चंद्रपूर/कोल्हापूर/यवतमाळ.
१०) कार्यासन अधिकारी, ब-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.